महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ हे प्रारूप नियम विचारात घेण्यास मुदतवाढ देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः आपना-२०१६/प्र.क्र.५०२/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०५ सप्टेंबर, २०१८.

वाचा :-

**शासन अधिसूचना, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.५०२/पापु-१५, दिनांक २५/०७/२०१८

प्रस्तावना :-

महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम, २००९ मधील प्रयोजने पार पाडण्यासाठी संदर्भाधीन अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ हे मसुदा नियम सर्वसामान्य जनतेच्या अभिप्रायांकरीता प्रसिध्द करण्यात आले आहेत. या मसुदा नियमांसंबंधी कोणत्याही व्यक्तीस हरकती-सूचना पाठवावयाच्या असतील तर त्या अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्याकडे दिनांक ३१/०८/२०१८ पर्यंत लेखी स्वरूपात अथवा psec.wssd@maharashtra.gov.in या ई-मेल संदेशावर दिनांक ३१/०८/२०१८ पर्यंत पाठवावयाच्या होत्या. दिनांक ३१/०८/२०१८ पर्यंत प्राप्त होणाऱ्या हरकती/ सूचना शासन विचारात घेणार आहे.

महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम, २००९ अंतर्गत तयार करण्यात आलेल्या महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ या मसुदा नियमांवर जनतेचे अभिप्राय उपलब्ध होण्यासाठी सर्व कार्यालय प्रमुखांना नियमांची व्यापक प्रसिद्धी करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. याशिवाय राज्यात सर्व महत्वाच्या कार्यालयांमध्ये मसुदा नियमांवर चर्चासत्रेही आयोजित केली जात आहेत. यामुळे राज्यात सर्वत्र भूजल नियमांचा प्रसार होऊन, जनतेच्या हरकती-सूचना प्राप्त होणे अपेक्षित आहे.

महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ या मसुदा नियमांच्या प्रसिद्धीसाठी विभागामार्फत / शासनाच्या विविध कार्यालयांमार्फत प्रसिद्धीसत्र / कार्यशाळा सुरु असून,

मसुदा नियमांवर अधिक गुणवत्तापूर्ण हरकती- सूचना प्राप्त होण्याकरिता शासनामार्फत मसुदा नियम विचारात घेण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, संदर्भाधीन अधिसूचनेद्वारे प्रसिध्द केलेले महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ हे मसुदा नियम शासनामार्फत विचारात घेण्यास दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

वर नमूद दिनांकापूर्वी महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ या मसुदा नियमांसंदर्भात कोणत्याही व्यक्तीस हरकती किंवा सूचना दाखल करावयाच्या असतील, तर त्या अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई यांच्याकडे दिनांक ३०/०९/२०१८ पूर्वी लेखी स्वरूपात अथवा psec.wssd@maharashtra.gov.in या ई-मेल संदेशावर पाठवाव्यात.

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे यांना सूचित करण्यात येते की, महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) नियम, २०१८ या मसुदा नियमांवर हरकती- सूचना नोंदविण्यासाठी दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत देण्यात आलेली मुदतवाढ सर्व शासकीय कार्यालये/ सर्वसामान्य जनता यांना कळविण्यासाठी योग्य ती कार्यवाही तातडीने करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक 201809041710169328 असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.09.05 10:44:20 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई.

५. सर्व मा. संसद सदस्य/ विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.

६. मा.मुख्य सचिव.

७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.

८. सर्व मंत्रालयीन विभाग.

९. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.

१०. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.

११. प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

१३. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई.

१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई.

१५. सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.

१६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

१८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.

१९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.

२०. सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.

२१. प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई.

२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (प्रसिद्धीकरिता)

२३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.

२४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

२५. अध्यक्ष, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.

२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

२८. सर्व विभागीय आयुक्त.

२९. सर्व जिल्हाधिकारी.

३०. सर्व आयुक्त, महानगरपालिका.

३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

३२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

३३. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका / नगरपंचायत.

३४. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

३५. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.

३६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई.

३७. निवडनस्ती.